2010102114153200l

**धुळे महानगरपालिका ठराव क्र.१३२, दिनांक १७.६.२००८ निलंबित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.लोआ/धुममपा-१०१०/७२४/प्र.क्र.१३३/१०/नवि-२५**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- 27 सप्टेंबर,२०१०**

**पहा :-** १) आयुक्त, धुळे महानगरपालिका यांचे पत्र क्र.धुमपा/नर/३९३/१०-११, दिनांक ६.९.२०१०.
२) धुळे महानगरपालिका महासभा ठराव क्र.१३२, दिनांक १७.६.२००८.

**प्रस्तावना:-** धुळे महानगरपालिका सर्वसाधारण महासभा ठराव क्र.१३२, दिनांक १७.६.२००८ अन्वये धुळे स.नं. ३९३/३+४पैकी आरक्षण क्र. १२४ बगीचासाठी आरक्षित असलेले क्षेत्र १३,८५० चौ. मी. भूसंपादनाचा प्रस्ताव नामंजूर करण्यात आला.

मंजूर विकास योजनेतील आरक्षणाची अंमलबजावणी करणे आवश्यक असल्याने तसेच यापूर्वी विषयांकित जागे व्यतिरिक्त उर्वरित जागेचा स.नं. ३९३/१+२ चा भुसंपादन प्रस्ताव जिल्हाधिकारी धुळे, यांच्याकार्यालयाकडे कार्यान्वीत आहे. त्यामुळे स. नं. ३९३/३+४, आरक्षण क्र. १२४ ही आरक्षित जागा संपादित करणे आवश्यक आहे. विकास आराखडयानुसार जमिनीचे भूसंपादन न करण्याचा निर्णय बेकायदेशीर असल्याने, धुळे महानगरपालिका महासभा ठराव क्र.१३२, दिनांक ११७.६.२००८ हा मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ४५१ अन्वये निलंबित करण्याची बाब शासनाकडे विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** धुळे महानगरपालिका महासभा ठराव क्र.१३२, दिनांक १७.६.२००८ ची अंमलबजावणी केल्यास , विकास आराखडयानुसार जमिनीचे भूसंपादन न करण्याचा निर्णय बेकायदेशीर ठरतो. त्यामुळे सदर ठराव हा मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ४५१(१) अन्वये निलंबित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

**(अ. बा. घरत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

२) महापौर, धुळे महानगरपालिका, धुळे.
३) आयुक्त, धुळे महानगरपालिका, धुळे.
४) मा.राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.सचिव (नवि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) नगर विकास विभाग, नवि-२९, मंत्रालय, मुंबई (वेबसाईटवर प्रसिध्दीकरिता)
७) निवडनस्ती (नवि-२५) (२ प्रती)